सांकेतिक क्रमांक - २०१४१२०११३०१५६९६२८

दरेवाडी साठवण तलाव ,ता.देवणी , जि.लातूर, या योजनेस द्वितीय सुधारित प्रशासकिय मान्यता प्रदान करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**

शासन निर्णय क्र. लपात २१०९/(२४६/२००९)/लपा-२
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक १०/०९/२०१२

पहावे : १) कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ यांचे पत्र क्र. गोमपाविम/ता-४/दरेवाडी सा.त. /सुप्रमा/३३८४/सप, दि. २.०५.२००९

**प्रस्तावना :**

दरेवाडी साठवण तलाव, ता.देवणी, जि.लातूर या योजनेस गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ यांचा निर्णय क्र. ता-४/७, दि.१७.६.२००६ अन्वये एकूण अंदाजित खर्च रु. ३१२.९६/- लक्ष एवढया किंमतीस प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली होती. हा सुधारित प्रशासकीय मान्यतेचा प्रस्ताव तयार करतांना सन २००३-०४ च्या दरसूचीप्रमाणे दर वापरण्यात आले होते. मध्यंतरीच्या काळात योजनेच्या खर्चात भूसंपादन किंमतीतील झालेली वाढ व इतर कारणे इत्यादी कारणांमुळे वाढ होत असल्यामुळे योजनेस द्वितीय सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करणे आवश्यक झाले आहे.

**शासन निर्णय**

शासन आता या निर्णयान्वये दरेवाडी साठवण तलाव, ता.देवणी, जि.लातूर या योजनेचा एकूण अंदाजित खर्च रुपये ३९२.६६६ लक्ष (रु.तीन कोटी, ब्यांन्नव लक्ष, सहासष्ट हजार, सहाशे फक्त) या किंमतीस द्वितीय सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करीत आहे. अंदाजपत्रकात उर्वरित कामासाठी सन २००७-०८ या वर्षाच्या दरसूचीप्रमाणे दर वापरण्यात आले आहेत. उपशीर्षवार तरतुदींचा गोषवारा सोबत परिशिष्टामध्ये जोडला आहे.

या योजनेच्या कामावरील खर्च मागणी क्र. आय-५, "४७०२ लहान पाटबंधारे यावरील भांडवली खर्च, ८०-सर्वसाधारण,(१९०) सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणूका (००) (०४), गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ भाग भांडवली अंशदान योजनांतर्गत, संगणक सांकेतांक क्र. ४७०२ ४९९ २" या लेखाशिर्षाखाली करण्यात यावा व शासनाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

D:\Bawaskar\2012\Darewadi.doc

ठळक बाबी

अ) योजनेचे सिंचन क्षेत्र ३०० हेक्टर आहे.

ब) योजनेमुळे एकूण होणारा पाणीसाठा १३७०.४८ सघमी आहे.

क) प्रति सहस्त्र घनमीटर पाणीसाठा किंमत रु. २८,६५२ /-

ड) लाभव्यय गुणोत्तर १.५२

हा निर्णय पाटबंधारे व वीज विभाग क्रमांक एपीएच/१०७३/३२६५६ (ई-३) दि.१७.७.७४ मधील परिशिष्ट क्रमांक २ (अ) नुसार, नियोजन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.७२/१४३४, दि.२०/४/२०१२ अन्वये व वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. १५२/व्यय-१२, दि. ३.६.२०१२ अन्वये दिलेल्या मंजुरीनुसार निर्गमीत करण्यात येत आहे.

या योजनेस प्रदान करण्यात आलेली व्दितीय सुधारित प्रशासकिय मान्यता (२५/२०१२) अनुक्रमांकावर नोंदण्यात आली आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

( प्र. र. कुलकर्णी )
शासनाचे अवर सचिव

प्रतिलिपी.

महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर.
महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा परिक्षा), मुंबई/नागपूर.
वित्त विभाग (व्यय-१२), मंत्रालय, मुंबई ३२
नियोजन विभाग (कार्यासन १४६१/१४३३), मंत्रालय, मुंबई ३२.
कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद.
मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, औरंगाबाद
(सोबत सुधारित प्रशासकीय मान्यतेची परिनिरीक्षण टिप्पणी जोडली आहे)
आंतर वित्त सल्लागार व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
अधीक्षक अभियंता, बीड पाटबंधारे प्रकल्प मंडळ,परळी वैजनाथ
कार्यकारी अभियंता, लातूर पाटबंधारे विभाग, लातूर
अर्थशाखा १/२ (२ प्रती), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
लपा-१ (२ प्रती), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
जिल्हाधिकारी, लातूर
विभागीय संपर्क अधिकारी, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई. (२ प्रती)
लपा-२, संग्रहार्थ.

शासन निर्णय क्रमांक : लपात २१०९/(२४६/२००९)/लपा-२, दि. १०/०९/२०१२ चे परिशिष्ट

दरेवाडी साठवण तलाव ,ता.देवणी , जि.लातूर

उपशिर्षनिहाय तरतूदी

| क्र. | उपशिर्ष | रक्कम (लक्ष) |
|---|---|---|
| १ | 'ए' सर्वेक्षण | १.० |
| २ | 'बी' भूसंपादन | १७२.५४ |
| ३ | 'सी' कामे | १७२.१७ |
| ४ | 'के' इमारत | ०.५ |
| ५ | "एम" वृक्षरोपण | ०.५ |
| ६ | 'ओ' संकीर्ण | ०.५ |
| ७ | "पी" देखभाल | ०.३ |
| ८ | 'आर' दळणवळण | १.० |
| ९ | एकूण | ३४८.५२ |
| १० | आनुषंगिक खर्च | ४४.१४६ |
| | **योजनेची एकूण किंमत (रु.लक्ष)** | ३९२.६६६ |

D:\Bawaskar\2012\Darewadi.doc